**राज्याने नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांना द्यावयाच्या मोटार वाहन कराच्या अभिहस्तांकित रकमा- रस्ता अनुदान (अनिवार्य) करीता नविन लेखाशीर्षास मान्यता प्रदान करणेबाबत**

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक-रस्ताअ-२०२४/प्र.क्र.३०८ /नवि-१६ (ई ८७१८६७)**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- १८ फेब्रुवारी , २०२५.

<u>वाचा :-</u>

(१) नगर विकास विभाग, शासन निर्णय, क्र. संकिर्ण-२०१५/ प्र.क्र.९०/ नवि-१६, दिनांक १६ जानेवारी, २०१६ व दिनांक १० जून,२०१६.

(२) मा.प्रधान महालेखाकार कार्यालयाचे पत्र क्र. TM/CH-१/Budget Scrutiny / २०२४-२५/२०० दि.१५.०५.२०२४

<u>प्रस्तावना :-</u>

राज्यातील महानगरपालिका / नगरपरिषदा / नगरपालिकांना रस्त्यांचा विकास करण्याकरीता “विशेष रस्ता अनुदान / सर्वसाधारण रस्ता अनुदान” या योजनेंतर्गत “सर्वसाधारण मार्ग अनुदान (३०५४ ००२२)” या लेखाशिर्षाखाली अनुदान देण्यात येत असे. सदर योजनेचे सुधारीत निकष व मार्गदर्शक तत्वे संदर्भाधीन क्रमांक (१) येथील शासन निर्णयान्वये विहित करण्यात आली आहेत. मा.प्रधान महालेखाकार कार्यालयाने या योजनेच्या लेखाशिर्षामध्ये बदल करण्याबाबत संदर्भ क्र. २ अन्वये सुचित केले असल्याने सदर योजनेसाठी नविन लेखाशीर्षास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्या अनुषंगाने पुढीलप्रमाणे शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

**शासन निर्णय :-**

विशेष रस्ता अनुदान / सर्वसाधारण रस्ता अनुदान (अनिवार्य) या योजनेच्या “सर्वसाधारण मार्ग अनुदान (३०५४ ००२२)” या लेखाशिर्षामध्ये बदल करुन आता “राज्याने नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांना द्यावयाच्या मोटार वाहन कराच्या अभिहस्तांकित रकमा - रस्ता अनुदान **(अनिवार्य)** (३६०४ १०५४)” या लेखाशीर्षास मान्यता देण्यात येत आहे.

| **मागणी क्र - एफ-४ (F-४)** | | | |
|---|---|---|---|
| ३६०४ | स्थानिक संस्था व पंचायतराज संस्था यांना नुकसान भरपाईच्या व अभिहस्तांकित रकमा देणे | 3604 | Compensation and Assignments to Local Bodies and Panchayati Raj Institutions |
| ०० | | 00 | |
| १०६ | वाहनांवरील कर | 106 | Tax on Vehicles |
| ०० | | 00 | |
| (००)(०१) | राज्याने नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांना द्यावयाच्या मोटार वाहन कराच्या अभिहस्तांकित रकमा - रस्ता अनुदान अनिवार्य / दत्तमत्त (३६०४ १०५४) ३१ सहायक अनुदान (वेतनेतर) | (00)(01) | Assignments of motor vehicle tax to be paid by the state to urban local bodies - Road grants Committed / Voted (3604 1054) 31 Grants In aid (Non salary ) |

२. संदर्भाधीन क्र. (१) येथील शासन निर्णयान्वये या योजनेस मान्यता देण्यात आली असून, सदर शासन निर्णयातील सर्व अटी व शर्ती बंधनकारक राहतील.

३. राज्यातील महानगरपालिका / नगरपरिषदा / नगरपालिकांना रस्त्यांचा विकास करण्याकरीता विशेष रस्ता अनुदान / सर्वसाधारण रस्ता अनुदान (३०५४ ००२२) या योजनेंतर्गत “सर्वसाधारण मार्ग अनुदान (३०५४ ००२२)” लेखाशिर्षाखाली मंजूर करण्यात आलेल्या कामांचे प्रलंबित असणारे दायित्व “राज्याने नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांना द्यावयाच्या मोटार वाहन कराच्या अभिहस्तांकित रकमा - रस्ता अनुदान (३६०४ १०५४)” या लेखाशिर्षामधून देण्यात येईल.

४. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. ५४९/व्याय ३ दि.१३/११/२०२४ व महालेखापाल कार्यालयाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. सं.ख.वि.चा-१ नगर विकास विभाग/ युओआर-२४३/२०२४-२५/१९८२ दि. ०६/०१/२०२५ अन्वये मिळालेल्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२५०२१८१७०८५६७९२५ असा आहे. हा शासन निर्णय डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SHRIKANT CHANDRAKANT ANDGE

Digitally signed by SHRIKANT CHANDRAKANT ANDGE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=URBAN DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=5d5ab93b4e4f2fcd87e12fe19b8965025d482b1bee0fffaa62085c34db6bfd8c, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=D8D9626C9E038380CD235C048F20D7CE74CFFD3A95F2AC3C192E9C991F358271, cn=SHRIKANT CHANDRAKANT ANDGE
Date: 2025.02.18 17:10:19 +05'30'

**( श्रीकांत आंडगे )**
**उप सचिव,महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई
२. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई-३२
३. मा. उप मुख्यमंत्री तथा मंत्री नगर विकास यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई-३२
४. मा.उप मुख्यमंत्री तथा मंत्री वित्त व नियोजन यांचे खाजगी सचिव मंत्रालय, मुंबई-३२
५. मा. राज्यमंत्री नगर विकास विभाग यांचे खाजगी सचिव मंत्रालय, मंत्रालय, मुंबई-३२
६. मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई-३२
७. अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, , मंत्रालय, मुंबई-३२
८. अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग, , मंत्रालय, मुंबई-३२
९. प्रधान सचिव (नवि-२) नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
१०. आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, मुंबई.
११. सर्व विभागीय आयुक्त
१२. सर्व जिल्हाधिकारी
१३. सर्व आयुक्त, महानगरपालिक
१४. महालेखापाल, महाराष्ट्र-१, मुंबई,
१५. महालेखापाल, महाराष्ट्र-२, नागपूर,
१६. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,

१७. सह संचालक,  लेखा व कोषागारे, संगणक कक्ष, नवीन प्रशासकीय इमारत, मुंबई.
१८. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
१९. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
२०. सर्व जिल्हा प्रशासन अधिकारी
२१. सर्व मुख्याधिकारी, नगरपरिष / नगरपंचायत
२२. वित्त विभाग, व्यय-३/ कोषा प्रशासन-५ /अर्थसं-१६ मंत्रालय,  मुंबई.
२३. कार्यासन नवि-४ नगरविकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
२४. निवड नस्ती (नवि-१६), नगरविकास विभाग, मंत्रालय, मुंबई.